**विधानमंडळाच्या समित्यांच्या कामकाजात मंत्रालयीन सचिवांनी सर्वतोपरी सहकार्य देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : संकीर्ण २०१७ / प्र. क्र. १७ / १८ ( र. व का.)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २ फेब्रुवारी, २०१७.

संदर्भ : लोकलेखा समिती प्रमुखांचे पत्र क्रमांक : २२९१, दिनांक १३ जानेवारी, २०१७.

**प्रस्तावना :-**

लोकलेखा समिती ही विधानमंडळाची एक महत्त्वाची समिती असून बहुतांशी विभाग सदर समितीच्या कामकाजास पुरेशा गांभीर्याने घेत नसल्याचे लोकलेखा समितीने शासनाच्या निदर्शनास आणले आहे. विशेषत: परिच्छेदांसंदर्भातील स्पष्टीकरणात्मक ज्ञापने वेळेवर न पाठविणे, बैठकीचा दिनांक निश्चित झाल्यावर एक ते दोन दिवस अगोदर ज्ञापने सादर करणे, बैठकीचा कार्यक्रम विभागांना पुरेशा कालावधीत कळवूनसुद्धा बैठकीच्या आदल्या दिवशी बैठक पुढे ढकलण्याबाबत विनंती प्राप्त होणे, साक्षी दरम्यान समितीच्या प्रश्नांना विभागीय सचिवांकडून समर्पक उत्तरे प्राप्त न होणे, विभागीय प्रतिनिधींचा साक्षीसाठी पूर्ण अभ्यास व तयारी नसणे, सचिवांची बैठक सुरु असताना अन्य अधिकाऱ्यांकडून प्रश्नांची माहिती घेणे तसेच साक्षीदरम्यान समितीच्या प्रश्नांना समर्पक उत्तरे न देता येऊ शकल्यास, माहिती लेखी स्वरुपात पाठविण्याबाबत आश्वासने देणे तथापि सदर माहिती न पाठविणे, अशा गंभीर बाबी समितीने शासनाच्या निदर्शनास आणल्या आहेत.

२. त्याचप्रमाणे विभागीय सचिवांच्या साक्षीसाठी आयोजित बैठकांसाठी समितीचे सदस्य राज्यातील वेगवेगळ्या भागांतून त्यांच्या व्यस्त कामकाजातून वेळ काढून बैठकीसाठी येत असतात. तथापि बैठकीचा कार्यक्रम सुमारे १५ दिवस आधी जाहिर होऊनसुद्धा अनेक वेळा विभागीय सचिवांकडून बैठका पुढे ढकलण्याची विनंती करणारे पत्र बैठकीच्या दिवशी समितीस प्राप्त होते. त्यामुळे समितीच्या सदस्यांना कोणतेही कामकाज न करता परत जावे लागते. याबाबत समितीच्या सर्व सदस्यांनी तीव्र नाराजी व्यक्त केली आहे.

**परिपत्रक :**

१. भविष्यात अशा घटनांची पुनरावृत्ती होऊ नये म्हणून सर्व मंत्रालयीन सचिवांना सूचित करण्यात येते की, त्यांनी लोकलेखा समिती तसेच विधानमंडळाच्या इतर सर्व समित्यांच्या कामकाजामध्ये सर्वतोपरी सहकार्य करावे. भविष्यात काही अपरिहार्य अथवा अतिमहत्त्वाच्या कारणास्तव विभागीय सचिवांना बैठक पुढे ढकलण्याबाबत विनंती करावयाची झाल्यास त्यांनी मुख्य सचिवांची मान्यता घेऊनच तशी विनंती समितीला करावी. त्यानंतरच समिती विहित व पुरेशा वेळेआधी प्राप्त पत्राचा विचार करेल. तसेच विधानमंडळाच्या समित्यांना आवश्यक माहिती विहित कालावधीत पाठविण्यात यावी. त्याचप्रमाणे बैठकीस उपस्थित राहताना संबंधित विषयाची संपूर्ण माहिती घेऊनच बैठकीसाठी उपस्थित राहण्याची काळजी घ्यावी, जेणेकरून समितीचे सर्वतोपरी समाधान होईल.

२. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेताक २०१७०२०२१२१८०६०५०७ असा आहे. तसेच डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावांने.

Swadheen S Kshatriya

Digitally signed by Swadheen S Kshatriya
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=CS. Office, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=76e14b6f43c756c3ff20fae3c144f674429eeb5e1859b459d4153e4f49f7b2f2, cn=Swadheen S Kshatriya
Date: 2017.02.03 17:18:03 +05'30'

**( स्वा. शि. क्षत्रिय )**
**मुख्य सचिव**

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव ( ५ प्रती ) (पत्राने),
२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव ( ५ प्रती ), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
३. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
४. मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/ विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. सर्व सन्माननीय संसद सदस्य, विधानसभा व विधानपरिषद सदस्य,
६. सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई, ( पत्राने ),
७. मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
८. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,
९. महाप्रबंधक, मा. मुंबई उच्च न्यायालय, मुंबई,
१०. प्रबंधक, मुंबई उच्च न्यायालय ( मूळ शाखा ), मुंबई,
११. प्रबंधक, मा. लोकायुक्त व मा. उप लोकायुक्त यांचे कार्यालय, नवीन प्रशासन भवन, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई,
१२. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई, ( पत्राने ),
१३. प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
१४. मा.मुख्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, मुंबई,
१५. सर्व विभागीय आयुक्त,
१६. सर्व जिल्हाधिकारी,
१७. सर्व मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख /
१८. प्रादेशिक प्रमुख / कार्यालय प्रमुख,
१९. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई,
२०. सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने, मंत्रालय, मुंबई ४०००३२,
२१. निवड नस्ती ( कार्यासन १८ ), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.